**भारतीय वन सेवेतील सन २०१९ च्या तुकडीतील अधिका-यांकरीता "On the Job Training (OJT)" प्रशिक्षण आयोजित करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- आयएफएस-१५२०/प्र.क्र.५७/फ-७अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक- ९ सप्टेंबर, २०२०

**संदर्भ**:- १. केंद्र शासन, पर्यावरण, वने व जलवायू परिवर्तन , मंत्रालय, पत्र क्र. डिओ नं १५०११/ १०/ २०१०-आयएफएस-२, दिनांक १८/०३/२०१६
२. इंदिरा गांधी राष्ट्रीय वन ॲकॅडमी यांचे पत्र क्र. F No 719/NFA-2020/70.21/(2019-21 Course)/OJT दिनांक १४/०८/२०२०

**प्रस्तावना:-**

संचालक, इंदिरा गांधी राष्ट्रीय वन ॲकॅडमी, डेहराडून यांच्या संदर्भाधीन दिनांक १४/०८/२०२० रोजीच्या पत्रान्वये असे कळविण्यात आले आहे की, देशभरातील कोव्हीड-१९ या संसर्ग जन्य रोगाच्या प्रसारामुळे भारतीय वन सेवेतील सन २०१९ च्या तुकडीतील परिविक्षाधीन अधिकारी यांच्या व्यावसायिक अभ्यासक्रम (Professional Training) प्रशिक्षणामध्ये व्यत्यय येत आहेत. यास्तव केंद्र शासनाच्या पर्यावरण, वने व जलवायू परिवर्तन, मंत्रालयाच्या सूचनेनूसार सदर परिविक्षाधीन भावसे अधिकाऱ्यांच्या प्रशिक्षण कार्यक्रमामध्ये बदल करण्यात येत असल्याचे आणि त्यांचे "On the Job Training (OJT)" प्रशिक्षण व्यावसायिक अभ्यासक्रम (Professional Training) पूर्ण होण्यापूर्वी म्हणजेच माहे मे-ऑगस्ट-२०२१ ऐवजी माहे ऑक्टोबर २०२० ते जानेवारी २०२१ या कालावधीत घेण्यात येणार असल्याचे कळविण्यात आले आहे. त्यानुसार सन २०१९ च्या तुकडीतील भारतीय वन सेवेतील महाराष्ट्र संवर्गातील ०७ परिविक्षाधीन अधिकारी यांना "On the Job Training (OJT)" प्रशिक्षण देण्याकरीता महाराष्ट्र राज्यातील वनवृत्तांमध्ये पदस्थापना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१९ च्या तुकडीतील, भारतीय वन सेवेतील, महाराष्ट्र संवर्गातील ०७ परिविक्षाधीन अधिकारी यांना इंदिरा गांधी राष्ट्रीय वन ॲकॅडमी, डेहराडून मधून दिनांक ३०/०९/२०२० रोजी कार्यमुक्त करण्यात येणार आहे. केंद्र शासनाच्या पर्यावरण, वने व जलवायू परिवर्तन , मंत्रालयाच्या संदर्भाधीन दिनांक १८/०३/२०१६ रोजीच्या पत्रानुसार सदर परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना राज्यात १६ आठवड्यांचे (दि. १ ऑक्टोबर २०२० ते दि. ३१ जानेवारी २०२१) "On the Job Training (OJT)" प्रशिक्षण राज्यातील वनवृत्तांमध्ये द्यावयाचे आहे. सदर प्रशिक्षण पूर्ण झाल्यानंतर दिनांक ०१ फेब्रुवारी

२०२१ पासून ऑगस्ट २०२१ पर्यंत त्यांना इंदिरा गांधी राष्ट्रीय वन ॲकॅडमी, डेहराडून येथे उर्वरीत व्यावसायिक प्रशिक्षण देण्यात येणार आहे.

त्यानुसार,भारतीय वन सेवेतील महाराष्ट्र संवर्गातील सन २०१९ च्या तुकडीतील परिविक्षाधिन अधिका-यांसाठी १६ आठवड्यांचे "On the Job Training (OJT)" प्रशिक्षण आयोजित करण्यासाठी त्यांची खालीलप्रमाणे पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिका-याचे नाव | वनवृत्ताचे नाव | वन विभाग |
|---|---|---|---|
| १. | श्री.अभिजित वायकोस | नाशिक | पूर्व नाशिक |
| २. | श्री.अग्रिम सैनी | नागपूर | गोंदिया |
| ३. | श्री.एन. जयकुमारन | चंद्रपूर | मध्य चांदा |
| ४. | श्री.शैलेश मीणा | गडचिरोली | वडसा |
| ५. | श्री.डि.के. वायभसे | नागपूर | वर्धा |
| ६. | श्री.जे. एम. शेख | ठाणे | डहाणू |
| ७. | श्री.बी. एन. स्वामी | यवतमाळ | यवतमाळ |

उक्त अधिकारी प्रशासकीय दृष्ट्या महाराष्ट्र राज्याच्या नियंत्रणाखाली रहाणार असून त्यांच्या ०१ ऑक्टोबर २०२० ते ३१ जानेवारी २०२१ या कालावधीकरीताचा वेतन व भत्यापोटी येणारा खर्च इंदिरा गांधी राष्ट्रीय वन अकादमी, डेहराडून यांचेकडून करण्यात येणार आहे. सदर प्रशिक्षणार्थींना दि. ३१ जानेवारी २०२१ रोजी इंदिरा गांधी राष्ट्रीय वन अकादमी, डेहराडून येथे जाण्यासाठी राज्यातून कार्यमुक्त करण्यात यावे.

तसेच उक्त परिविक्षाधीन अधिका-यांसोबत समन्वय राखण्यासाठी मार्गदर्शक (Mentor) म्हणून खालील अधिकाऱ्यांची नेमणुक करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व पदनाम | कार्यालय | संपर्क क्रमांक |
|---|---|---|---|
| १ | श्री.आर.के.वानखेडे, मुख्य वनसंरक्षक | मुख्य वनसंरक्षक (शिक्षण व प्रशिक्षण), पुणे | ०२०-२५६६४१८९<br>९४२३६४८२१४ |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००९०९१६५२५८९३१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुनकाढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानूसार व नावाने.

Arvind Shankar Apte

Digitally signed by Arvind Shankar Apte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0a68ee850c7ae56e3bbf1e252bef5c7e2ba3631df8eadfdcd47cdd3c33b91a1, cn=Arvind Shankar Apte
Date: 2020.09.09 16:54:10 +05'30'

(अरविंद आपटे)

मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)

**प्रत:-**

१. मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

२. मा.राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. प्रधान सचिव (वने) यांचे वरिष्ठ स्विय सहायक, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर,
५. संचालक,इंदिरा गांधी राष्ट्रीय वन अकादमी, डेहराडून ,
६. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण) पुणे.
७. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, (कार्मिक),नागपूर.
८. मुख्य वनसंरक्षक, ( शिक्षण व प्रशिक्षण) पुणे.
९. श्री.आर.के.वानखेडे, मुख्य वनसंरक्षक, ( शिक्षण व प्रशिक्षण) पुणे.
१०.मुख्य वनसंरक्षक नागपूर/चंद्रपूर/गडचिरोली/ठाणे/यवतमाळ/नाशिक.
११.उप वनसंरक्षक पूर्व नाशिक/गोंदिया/मध्य चांदा/वडसा/वर्धा/डहाणू/यवतमाळ.
१२.संबंधित परिविक्षाधिन भावसे अधिकारी.
१३.महालेखापाल (लेखा व परिक्षा /लेखा व अनुज्ञेयता )मुंबई/नागपूर.
१४.अवर सचिव कार्यासन /फ-७, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५.कोषागार अधिकारी नागपूर/चंद्रपूर/गडचिरोली/ठाणे/यवतमाळ/नाशिक.
१६.सहायक संचालक, भावसे/लेखा कक्ष, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७.निवडनस्ती, कार्यासन फ-७ अ.